**गोकुळपेठ मार्केट, मौजा-गाडगा, येथील खसरा क्रमांक २८/१ या जागेवर नागपूर सुधार प्रन्यास व नागपूर महानगरपालिका यांचे संयुक्त माध्यमातून प्रकल्प राबविण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांक-नासुप्र-१६२३/प्र.क्र.१११/नवि-२६**
**नगर विकास विभाग,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-२१ जुलै, २०२३.

<u>वाचा</u> :- सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्रमाक /का.अ.१७ दि.२०.०४.२०२३ व
पत्र क्र.काआ/२५५२ दि.१५.०६.२०२३.

**<u>प्रस्तावना:-</u>**

नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळाने केलेल्या ठराव क्र.२१/११०८, दि.३०.०४.२०१२ नुसार धरमपेठ एक्सपांशन स्कीम अंतर्गत मौजा गाडगा येथील संपादित जागेवर १४२०५.५५ चौ.मी. जागेवर नागपूर सुधार प्रन्यास व नागपूर महानगरपालिका यांचे संयुक्त माध्यमातून प्रॉफीट शेअरिंग तत्वावर व्यापारी संकूल बांधण्याकरिता मंजूरी प्रदान करण्यात आली. तसेच नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळाने ठराव क्र.१४/१२०९/२८.०३.२०२३/EO/Secy-२, दि.२८.०३.२०२३ अन्वये याच अनुषंगाने ठराव करण्यात आला आहे.

यानुसार नागपूर सुधार प्रन्यास यांच्या संदर्भाधीन पत्रांन्वये गोकुळपेठ मार्केट प्रकल्प ५०% खर्च व ५०% नफा या तत्वावर संयुक्त विद्यमाने राबविण्याकरिता शासनाची मान्यता प्राप्त करण्यासाठी प्रस्ताव सादर केला आहे. याअनुषंगाने मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नागपूर येथील मौजे गाडगा येथील खसरा क्र.२८/१ गोकुळपेठ मार्केट या जागेवर नागपूर सुधार प्रन्यास व नागपूर, महानगरपालिका यांच्या ५०% खर्च व ५०% नफा या तत्वावर संयुक्त विद्यमाने प्रकल्प राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२) या प्रकल्पाकरिता खालीलप्रमाणे अधिकाऱ्यांची समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, महानगरपालीका नागपूर | सह अध्यक्ष |
| ३ | महाव्यवस्थापक, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ४ | उपायुक्त (मालमत्ता) महानगरपालिका | सदस्य |
| ५ | अधिक्षक अभियंता (मुख्यालय), नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ६ | अधिक्षक अभियंता (म.न.पा.) | सदस्य |
| ७ | उप संचालक, नगररचना, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ८ | उप संचालक, नगररचना, महानगरपालिका,नागपूर | सदस्य |
| ९ | कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| १० | स्थावर अधिकारी, महानगरपालिका,नागपूर | सदस्य |
| ११ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| १२ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, महानगरपालिका,नागपूर | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| १३ | कार्यकारी अभियंता (पश्चिम), नागपूर सुधार प्रन्यास | समन्वय अधिकारी |
| १४ | कार्यकारी अभियंता, (प्रकल्प) महानगरपालिका,नागपूर | समन्वय अधिकारी |

३) शासनाने अथवा शासनाचे प्राधिकरणाने जसे नीती आयोग यांनी सुनिश्चित केलेल्या विविध मॉडेलचा अभ्यास करुन सदर प्रकल्प आर्थिकदृष्या सुसाध्य (Financial viable) होण्यासाठी तज्ञ Transaction Adviser यांची नेमणूक करुन कोणते मॉडेल निवड करण्याचे अधिकार समितीला प्रदान करण्यात येत आहेत.

४) मौजे गाडगा खसरा क्र.२८/१ गोकुळपेठ मार्केट या नागपूर सुधार प्रन्यासच्या मालकीच्या जमीनीवर नागपूर सुधार प्रन्यासचे ७२ गाळे धारक व नागपूर महानगरपालिकेचे २२३ दुकानदार व १३ ओटेधारक आहेत. सदर जागेवरील इमारत अतिशय धोकादायक जिर्ण झाली असल्याने कधीही कोसळून जिवित व वित्त हानी होऊ शकते. यास्तव गोकूळपेठ मार्केट येथे सध्या अस्तित्वात दुकानदार, ओटे धारक व गाळेधारक त्यांचे नागपूर सुधार प्रन्यासच्या पुनर्वसन प्रचलित पध्दतीने (बांधकामांची किमत वसूल करुन) गाळे धारकांबरोबर समन्वय साधून त्याच जागेवर व्यापारी संकूल बांधून त्यांचे पुनर्वसन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५) वेस्ट हायकोर्ट रोड लॉ कॉलेज चौक ते शंकरनगर चौक या रस्त्यावरील पार्किंगची व्यवस्था देखील या प्रकल्पामध्ये होईल या प्रकारे नियोजन करण्याची दक्षता घ्यावी.

६) या आदेशाच्या अनुषंगाने कालबध्द व विनाविलंब पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०७२११६१३३३३१२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2023.07.21 16:51:54 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) आयुक्त तथा प्रशासक, नागपूर महानगरपालिका, नागपूर
४) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
५) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई